निवृत्तिवेतनधारकांची पुनर्नियुक्तीवरील वेतननिश्चिती - मृत्यु-नि-सेवा उपदानाचे निवृत्तिवेतन सममूल्य वजा न करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
शासन निर्णय क्र.पुनिवे १००५/११८/सेवा - ४
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक :१४ नोव्हेंबर २००५

## निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पुनिवे १०८९/४७९/सेवा - ४, दिनांक १६ मार्च १९९० अन्वये शासनाने असा निर्णय घेतला आहे की, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ च्या नियम १५७ (२)मधील तरतुदींनुसार पुनर्नियुक्तीवरील निवृत्तिवेतनधारकांचे सुरुवातीचे वेतन निश्चित करताना, मृत्यु-नि-सेवा उपदानाचे निवृत्तिवेतन सममूल्य किंवा निवृत्तिवेतनाऐवजीच्या उपदानाचे निवृत्तिवेतन सममूल्य यांची रक्कम निश्चित करण्यात येणाऱ्या वेतनामधून वजा करण्यात येऊ नये. हे आदेश दिनांक १ जानेवारी १९९० पासून अंमलात येतील असे उपरोक्त शासन निर्णयात विहीत करण्यात आले आहे.

२. तथापि, "रिट पिटिशन क्र.२८९३/१९९० - श्री. एस. एफ. रेगो विरुध्द महाराष्ट्र राज्य व इतर " या प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २२ जुन २००४ रोजी दिलेल्या निवाडयाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, उपरोक्त शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १६ मार्च १९९० अन्वये घेण्यात आलेला निर्णय दिनांक १ जुन १९८८ पासुन अंमलात येईल.

३. दिनांक १ जून १९८८ रोजी पुनर्नियुक्तीवर असलेल्या व ज्यांच्या प्रकरणी त्यांचे सुरुवातीचे वेतन निश्चित करतांना मृत्यू-नि-सेवा उपदानाचे निवृत्तिवेतन सममूल्य किंवा निवृत्तिवेतनाऐवजीच्या उपदानाचे निवृत्तिवेतन सममूल्य यांची रक्कम विचारात घेण्यात आली होती, त्यांना देखील हे आदेश लागू होतील. म्हणून अशा पुनर्नियुक्त निवृत्तिवेतनधारकांचे वेतन, मृत्यू-नि-सेवा उपदानाचे निवृत्तिवेतन सममूल्य किंवा निवृत्तिवेतनाऐवजीच्या उपदानाचे निवृत्तिवेतन सममूल्य यांची रक्कम विचारात न घेता दिनांक १ जून १९८८ पासून पुनर्निधारित करण्यात यावे.

४. महाराष्ट्र नागरी सेवा(निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील यासंबंधीच्या विद्यमान तरतुदींमध्ये या शासन निर्णयाच्या तरतुदींपुरती सुधारणा करण्यात आली आहे असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमात यथावकाश रितसर सुधारणा करण्यात येईल.

५. या शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

उषा प्र. महाजन
शासनाच्या उप सचिव

रोटा/एच-1290(13,000+40-11-2005)-1

प्रति,

प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (५० प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १० प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व उपकोषागार अधिकारी

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,

सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),

सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्ह्यांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे.

Fixation of pay of re-employed pensioners - discontinuance of deduction of Pension Equivalent of death-cum-retirement Gratuity

# GOVERNMENT OF MAHARASHTRA

## Finance Department

Government Resolution No.RES-1005/118/SER- 4
Mantralaya, Mumbai- 400 032, dated 14th November 2005.

## RESOLUTION

Vide Government Resolution, Finance Department, No. RES-1089/479/SER- 4, dated 16th March 1990, Government has directed that in fixing the initial pay of re-employed pensioners under the Rule 157 (2) of Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, the pension equivalent of death-cum-retirement gratuity or gratuity in lieu of pension should not be deducted from the pay so fixed. It has been prescribed in the aforesaid Government Resolution that the said orders shall have effect from 1st January 1990.

2. However, with a view to implementing the Hon'ble High Court, Mumbai judgment, dated 22nd June 2004, delivered in the case of "Writ Petition No.2893/1990-Shri S.F. Rego V/s. State of Maharashtra & others," Government is now pleased to direct that the decision taken vide aforesaid **Government Resolution, Finance Department, dated 16th March 1990, shall have effect from 1st June 1988**.

3. These orders will also apply to re-employed pensioners who are already in re-employment as on 1st June 1988 and in whose case pension equivalent of death-cum-retirement gratuity or gratuity in lieu of pension was taken into consideration while fixing their initial pay. Their pay would, thererfore, be required to be refixed with effect from the 1st June 1988 by ignoring the element of pension equivalent of death-cum-retirement gratuity or gratuity in lieu of pension.

4. The existing provisions of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 in this respect should be deemed to have been amended to the extent of the provisions of this Resolution. A formal amendment to these Rules will be made in due course.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**Usha P. Mahajan**
**Deputy Secretary to Government.**

---